**"कन्या वन समृध्दी" योजनेंतर्गत ज्या शेतकरी कुटूंबामध्ये मुलगी जन्माना येईल अशा शेतकरी दाम्पत्याने शासनाच्या मदतीने मुलीच्या नावे १० वृक्षांची लागवड करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- साववि -२०१६/प्र.क्र. १६५/फ-११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २७.०६.२०१८.

**प्रस्तावना:-**

भारत हा कृषीप्रधान देश आहे. ५०% पेक्षा जास्त लोक खेडयात राहतात आणि शेतीवर उपजीविका भागवतात. शेतक-यांच्या घराजवळ परसदारी रिकामी जागा उपलब्ध असते. तसेच शेतामधील बांधावर झाडे लावण्यासाठी देखील जागा उपलब्ध असते. त्याशिवाय शेतकऱ्यांची खाजगी पडीक जमीन वृक्ष लागवडीखाली उपलब्ध होऊ शकते.

भौगोलिक क्षेत्राच्या ३३% क्षेत्र वनाच्छादित करण्यासाठी वन विभागाकडून नवनवीन योजना नियमितपणे राबविण्यात येत आहेत. या योजनांमध्ये नागरिकांचा सक्रिय सहभाग असावा, यासाठी सामान्य लोकांच्या सामाजिक गरजांचे भान ठेवून सदर योजना तयार केल्या जातात. या पार्श्वभूमीवर सध्या अत्यंत महत्वाचा प्रश्न म्हणजे लोकसंख्या वाढ आणि स्त्री भ्रूणहत्या. या बाबत सामाजिक जनजागृती आवश्यक आहे.

वैश्विक तापमान वाढीचे संकट, त्यामुळे निसर्गामध्ये झालेले मोठे फेरबदल, ऋतूबदलामुळे पावसाचा लहरीपणा, गारपीट/ वादळ / अवकाळी पाऊस/ ढगफुटी/ अतिवृष्टी/ महापूर अशा नैसर्गिक आपत्तींमध्ये झालेली वाढ, वाढते प्रदूषण इत्यादी कारणांमुळे पर्यावरणाचे संतुलन आणि जैवसृष्टीची स्थिरता (Ecological Stability) यामध्ये सातत्याने बदल होत आहेत. यावर प्रभावी उपाययोजना म्हणून मोठया प्रमाणात वृक्ष लागवड करण्याशिवाय पर्याय नाही, हे जागतिक स्तरावर मान्य झाले आहे. त्यासाठी विविध माध्यमातून राज्यातील वन क्षेत्र व वृक्षाच्छादन वाढविण्यासाठी वन विभागाचे सातत्याने प्रयत्न सुरु आहेत.

वाढत्या लोकसंख्येचा विचार करता पर्यावरण संवर्धनाच्या दृष्टीने समाजातील सर्व घटकांचा कोणत्या ना कोणत्या स्वरुपात सहभाग घेऊन जास्तीत जास्त झाडे लावणे अपेक्षित आहे. या सर्व बाबींचा विचार करुन " कन्या वन समृध्दी " ही योजना सुरु करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** प्रस्तावनेत नमूद बाबी विचारात घेऊन "कन्या वन समृध्दी" ही योजना सुरु करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**योजनेचा उद्देश :-**

१) वनक्षेत्राव्यतिरिक्त जास्तीत जास्त वनेत्तर क्षेत्र वनाखाली आणणे.

२) ज्या कुटूंबामध्ये मुलगी जन्माला येईल अशा शेतकरी दाम्पत्यांला १० रोपे विनामूल्य देऊन प्रोत्साहित करणे.

३) पर्यावरण, वृक्ष लागवड व संगोपन आणि संवर्धन, जैवविविधता इत्यादी बाबत सध्याच्या आणि भावी पिढीमध्ये आवड आणि रुची निर्माण करणे.

४) अशा योजनेमधून मुलगा आणि मुलगी समान असून महिला सक्षमीकरण आणि सबलीकरण यासाठी सामाजिक संदेश देणे. तसेच मुलींच्या घटत्या संख्येवर अशा योजनांद्वारे काही प्रमाणात नियंत्रण मिळविणे.

**योजनेचे स्वरुप :-**

१) सदर योजनेच्या लाभाकरिता शेतकरी कुटुंबात जन्म झालेल्या मुलीच्या पालकांनी मुलीचा जन्म झाल्यानंतर संबंधित ग्रामपंचायत या ठिकाणी मुलीच्या नावाची नोंद केल्यानंतर संबंधित ग्रामपंचायतीकडे विहित नमुन्यात अर्ज करावा. अर्जाचा नमुना सोबत जोडला असून वन विभागाकडून ग्रामपंचायतींना उपलब्ध करुन देण्यात येईल.

२) ज्या शेतकरी दांपत्यास मुलगी होईल त्या शेतकरी दांपत्याने मुलीसाठी तिच्या जन्मानंतर येणाऱ्या पहिल्या पावसाळयात दि. १ ते ७ जुलै या कालावधीत १० झाडे लावण्याची संमती विहित नमुन्यातील अर्जात दर्शवावी.

३) अर्जामध्ये मुलीचे संपूर्ण नाव, पालकाचे संपूर्ण नांव, संपर्कासाठी संपूर्ण पत्ता व आधार कार्ड नंबर इत्यादीचा उल्लेख करावा.

४) मुलीच्या जन्मानंतर येणाऱ्या पहिल्या पावसाळयापूर्वी वृक्षारोपणासाठी १० खड्डे खोदून तयार ठेवावेत.

५) नजीकच्या सामाजिक वनीकरण विभागाच्या रोपवाटिकेतून १० रोपे विनामुल्य ग्रामपंचायतीमार्फत दिली जातील. त्यामध्ये ५ रोपे सागाची/सागवान जडया, २ रोपे आंबा, १ फणस, १ जांभूळ आणि १ चिंच इत्यादी भौगोलिक परिस्थितीनुसार अन्य प्रकारच्या फळांच्या रोपांचा समावेश असेल.

६) एकंदर १० झाडांची लागवड पूर्ण झाल्यावर लागवड केलेल्या ठिकाणाचे तपशील व मोबाईलद्वारे किंवा कॅमेराद्वारे रोपांचे फोटो संबंधित शेतकऱ्यामार्फत ग्रामपंचायतीस सादर केले जातील. सदर माहिती ग्रामपंचायतीमार्फत एकत्रित करुन तालुका स्तरावरील वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण यांना दरवर्षी ३१ जुलै, पर्यंत पाठविली जाईल.

७) लागवड केलेल्या झाडांपासून मिळणारे सर्व उत्पन्न मुलीचा कौशल्य विकास, उच्च शिक्षण आणि रोजगार मिळविणे व मुलीच्या उज्जल भविष्यासाठी शेतकऱ्यांना त्यांच्या ऐच्छिकतेनुसार वापरण्यास मुभा राहील.

८) लागवड केलेल्या झाडांची निगा,संरक्षण,संगोपन आणि झाडे जिवंत राहण्याचे प्रमाण उच्च रहावे याकरिता शेतक-यांना तांत्रिक सल्ला सामाजिक वनीकरण विभागामार्फत देण्यात येईल. संबंधित शेतकऱ्यांनी दरवर्षी दि. ३१ मे रोजी वृक्ष जिवंत असल्याच्या प्रमाणाबाबत ग्रामपंचायतीस माहिती द्यावी. ग्रामपंचायतींनी त्या संदर्भातील नोंद योग्य त्या प्रपत्रात व रजिस्टरमध्ये ठेवावी. तसेच दरवर्षी दिनांक ३० जून पर्यंत वृक्ष जिवंत राहण्याच्या प्रमाणाबाबत

एकत्रित माहिती ग्रामपंचायतींनी तयार करुन संबंधित तालुक्याचे वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण यांना पाठवावी.

९) वरील योजना ज्या शेतकऱ्यांच्या कुटुंबामध्ये जास्तीत जास्त २ मुली जन्माला येतील व त्यानंतर कुटुंबातील अपत्यांची संख्या नियंत्रित केली जाईल त्यांच्याचपुरती मर्यादित असेल. म्हणजेच १ मुलगा किंवा १ मुलगी अथवा दोन्ही मुली ज्या कुटुंबात असतील त्यांनाच या योजनेचा लाभ दिला जाईल.

१०) ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये ज्या शेतकरी कुटुंबात मुलगी जन्माला येईल त्या शेतकऱ्यांनी त्यांच्याकडील उपलब्ध जागेत किमान १० वृक्ष लावावेत, यासंदर्भात ग्रामसेवक, सरपंच, उपसरपंच आणि ग्रामपंचायत सदस्य जास्तीत जास्त शेतकऱ्यांना प्रोत्साहित आणि उद्युक्त करतील. शेतकरी कुटुंबात मुलगी जन्माला आल्याबद्दल ग्रामसेवक व ग्रामपंचायतीचे पदाधिकारी संबंधित शेतकरी कुटुंबाची भेट घेऊन अभिनंदन करतील. मुलीच्या जन्माच्या नोंदीच्या वेळी “कन्या समृध्दी योजनेबाबत” संपूर्ण माहिती, अर्ज करणे, वृक्ष लागवडीसाठी खड्डे तयार करणे आणि प्रत्यक्ष वृक्ष लागवडीनंतर वृक्षांचे संगोपन करणे इत्यादी माहिती ग्रामपंचायतीद्वारे संबंधित शेतकरी कुटुंबास सविस्तरपणे सांगण्यात येईल.

**रोपांच्या वाटपाचा कालावधी :-**

१) मागील वर्षाचा दि. १ एप्रिल ते चालू वर्षाचे ३१ मार्च हे वर्ष गृहित धरून प्रत्येक ग्रामपंचायत क्षेत्रामध्ये किती शेतकरी कुटुंबामध्ये मुलींचा जन्म झाला त्याची माहिती संबंधित ग्रामपंचायतींने तयार करावी. संबंधित तालुक्याचे वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण यांनी दि. ३१ मे पर्यंत माहिती ग्रामपंचायतीकडून घेवून संकलित करावी. वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण यांनी नजिकच्या रोपवाटिकातून प्रत्येक ग्रामपंचायतींना रोपांची उपलब्धता दि. ३० जून पर्यंत करावी.

२) ज्या शेतकऱ्याच्या कुटूंबात मुलीचा जन्म झाला आहे, त्या शेतकऱ्यांना ग्रामपंचायतीमार्फत १ जुलै या एकाच दिवशी रोपांचे वाटप करावे. संबंधित शेतकऱ्याने या योजनेच्या अनुषंगाने दिनांक १ ते ७ जुलै पर्यंत वृक्ष लागवड करुन माहिती संबंधित ग्रामपंचायतीला द्यावी. तसेच वर नमूद केल्याप्रमाणे लागवड केलेल्या ठिकाणाचे तपशील व मोबाईलद्वारे किंवा कॅमेराद्वारे रोपांचे फोटो संबंधित शेतकऱ्यांमार्फत ग्रामपंचायतीस सादर केले जातील. सदर माहिती ग्रामपंचायतींनी एकत्रित करुन तालुका स्तरावरील वनक्षेत्रपाल, सामाजिक वनीकरण यांना दरवर्षी दिनांक ३१ जुलै पर्यंत पाठविली जाईल.

**रोपांचे वाटप व वृक्ष लागवडीची नोंद :-**

रोपांचे वाटप मान्यवरांच्या हस्ते करण्यात यावे. रोपांचे वाटप करण्यापूर्वी ज्या कुटूंबात रोपांचे वाटप करावयाचे असेल, त्यांना किमान ४ ते ६ दिवस आधी ग्रामंपचायतींमार्फत टोकन दिले जाईल. त्यामुळे कमी वेळात व्यवस्थितरित्या रोपांचे वाटप होऊ शकेल. तसेच संबंधित कुटूंबांनी दि. १ ते ७ जुलै या आठवडयात अशी झाडे लावल्याबाबत योग्य ती नोंद ग्रामपंचायत रजिस्टरमध्ये वृक्ष नोंदवहीतील फॉर्म क्र. ३३ मध्ये ठेवावी.

**रोपांची उपलब्धता :-**

सामाजिक वनीकरण विभागाकडून एमजी-नरेगा अंतर्गत विकसित करण्यात येणाऱ्या रोपवाटिकांमधून या योजनेसाठी लागणारी रोपे प्रामुख्याने उपलब्ध करुन देण्यात येतील. जर अगदी अपवादात्मक परिस्थितीत रोपांची उपलब्धता एमजी-नरेगा अंतर्गत विकसित करण्यात येणाऱ्या रोपवाटिकांमधून उपलब्ध होऊ शकली नाही तर वन विभागाच्या इतर नियमित योजना / कार्यक्रमांमधून उदा. वनमहोत्सव, मध्यवर्ती रोपमळे इत्यादीतून विकसित केलेल्या रोपवाटिकांमधून अगदी आवश्यक असतील तेवढी रोपे या योजनेच्या अंमलबजावणीसाठी उपलब्ध करुन देण्यात यावीत.

सदर योजनेकरिता प्रथम वर्षात किमान २ लक्ष रोपे उपलब्ध करावी लागतील असे अपेक्षित आहे. तद्‌नंतर प्रतिवर्षी किमान १०% अधिक लाभार्थी येतील असे अपेक्षित धरुन दरवर्षी १०% अधिक रोपेनिर्मितीचे नियोजन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय मा. मंत्रीमंडळाची दि. २७.०६.२०१८रोजी येथे झालेल्या बैठकीत मिळालेल्या मान्यतेनुसार आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १५५/व्यय-१०, दि. २१.०५.२०१८ आणि नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ८०/१४७५, दि. १९.०४.२०१८ आणि ग्रामविकास विभाग, रोजगार हमी योजना विभाग आणि सार्वजनिक आरोग्य विभाग यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२८१५३९५७५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2018.06.28 15:47:59 +05'30'

**( वीरेन्द्र तिवारी )**
**मुख्य वनसंरक्षक, मंत्रालय**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४. मा. सर्व मंत्री/मा. राज्यमंत्री
५. मा. सर्व विधानसभा सदस्य/विधान परिषद सदस्य
६. मा. मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.
७. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक.
८. सर्व प्रशासकीय विभागांचे अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
९. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),नागपूर.
१०. सर्व प्रधान मुख्य वन संरक्षक.

११. सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक.
१२. सर्व विभागीय आयुक्त (महसूल).
१३. सर्व मुख्य वन संरक्षक (प्रादेशिक).
१४. सर्व जिल्हाधिकारी.
१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१६. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त.
१७. सर्व प्रशासकीय विभागांचे विभाग प्रमुख.
१८. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/नगर पंचायत.
१९. सर्व वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण वृत्त.
२०. सर्व उपवनसंरक्षक (प्रादेशिक)/वन्यजीव.
२१. सर्व विभागीय वन अधिकारी, सामाजिक वनीकरण विभाग, (सर्व जिल्हे)
२२. महालेखापाल, (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
२३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई -४०० ०३२.
२५. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई.
२६. वित्त विभाग, व्यय-१०, अर्थसंकल्प- ०६ मंत्रालय, मुंबई-३२
२७. कार्यासन अधिकारी, फ-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२८. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२९. सह सचिव/उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३०. निवडनस्ती/फ-११.

**"कन्या वनसमृध्दी" योजनेत लाभ घेण्याविषयी लाभार्थ्याचा अर्ज.**

**प्रति,**

**-----------------------**

**------------ ग्रामपंचायत,**

**विषय :- "कन्या वनसमृध्दी" योजनेअंतर्गत लाभ मिळणेबाबत.**

**संदर्भ :-** शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. साववि-२०१६/
प्र.क्र.१६५/फ-११, दिनांक २७.०६.२०१८.

मी उपरोक्त शासन निर्णयातील तरतूदींनुसार कन्या वन समृध्दी योजनेचा लाभ घेवू इच्छितो/इच्छिते.

१. **पालकांचे नाव**

वडीलांचे नाव :- -------------------------------------------------

आईचे नाव :- -------------------------------------------------

सध्याचा पत्ता :- -------------------------------------------------

२. **आधारकार्ड क्रमांक**

वडील - [ ] आई - [ ]

३. **लाभार्थी बालीकेची माहिती -**

| पूर्ण नाव | जन्म दिनांक व ठिकाण | जन्माची नोंद कोठे केली आहे | नोंद केल्याची तारीख व क्रमांक |
|---|---|---|---|
| | | | |

४. **कुटूंबातील एकूण बालकाची माहिती -**

| अ.क्र. | बालक/बालिकेचे नाव | पु./स्त्री | जन्म दिनांक | वय |
|---|---|---|---|---|
| १ | | | | |
| २ | | | | |

५. <u>कन्या वन समृध्दी योजनेतंर्गत मला खालीलप्रमाणे वृक्ष प्रजाती उपलब्ध करुन मिळाव्यात</u> -

| अ.क्र. | वृक्ष प्रजातीचे नाव | संख्या |
|---|---|---|
| १ | | |
| २ | | |
| ३ | | |
| ४ | | |
| ५ | | |

अर्जात दिलेले वर नमूद केलेली माहिती खरी असून, शासनाने कन्या वन समृध्दी योजनेबाबत विहित केलेल्या नियम व अटी मला मान्य आहेत. मी या योजनेंतर्गत रोपे लागवड केल्यानंतर, त्यांची सुयोग्य जोपासना व संरक्षण करीन. तसेच एकंदर १० झाडांची लागवड पूर्ण झाल्यावर लागवड केलेल्या ठिकाणाचे तपशील व मोबाईलद्वारे किंवा कॅमेराद्वारे रोपांचे फोटो ग्रामपंचायतीस सादर करेन. तरी मला योजनेत सहभागी करुन घ्यावे, ही विनंती.

अर्जासोबत ७/१२ व ८अ चा उतारा आणि आधारकार्डची छायांकित प्रत स्वप्रमाणित (Self-Attested ) करुन सोबत जोडली आहे.

**स्थळ :-** आपला/आपली विश्वासू,

**दिनांक :-**

**(लाभार्थीचे नाव व सही/अंगठा)**